**Convertion in Regular Temparary Establishment:- Shri. Vishvanath B. Jondhale, working under Superintending Engineer &, Administrator, CADA, Ahmadnagar**

**कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदाचे अस्थायी आस्थापनेवरील पदामध्ये रुपांतरण अधिक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,अहमदनगर-श्री.विश्वनाथ बा. जोंधळे, वाहनचालक.**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग,

शासन निर्णय क्रमांक : एसयुटी-१०९६ /(६५/९६) /आ (कामगार )

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांकः- १२/१२/२०११

पहावे:-:१) शासन निर्णय ,पाटबंधारे विभाग, क्र- इएसडब्ल्यू-१४८७/(१३७/८७)आ(का), दिनांक- २७/०९/१९८८

२) पाटबंधारे विभाग,शुध्दीपत्र क्र-इएसडब्ल्यू-१४८७/(१३७/८७)आ(का), दिनांक- २०/०३/१९८९.

३) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रः- रु.अ.आ- १५९६/२२८/ सेवा- ५, दिनांक- २४.४.२००१.

४) अधिक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,अहमदनगर यांचे पत्र क्रः- लाक्षेविप्रा/आ-३/८६६२, दिनांक-२७.१२.२०१०.

**प्रस्तावना** :-

अधिक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,अहमदनगर अंतर्गत श्री.विश्वनाथ बापू जोंधळे, हे दिनांक- २९/१०/१९८० पासून रोजंदारीवर मजूर म्हणून काम करित असतांना त्यांना ‘मजूर’ या पदाऐवजी ‘वाहनचालक’ म्हणून दिनांक-२१/१०/१९८५ पासून रुपांतरित अस्थाई आस्थापनेवर घेण्यात आले. नंतर दिनांक २०/०३/१९८९ च्या शुध्दीपत्रकान्वये श्री.जोंधळे यांचे ‘वाहनचालक’ ऐवजी ‘मजूर’ पदावर दुरुस्ती आदेश काढण्यात आले. सदर आदेशाविरुध्द श्री.जोंधळे यांनी मा.औद्योगिक न्यायालयात युएलपी क्र.१०९/८९ दाखल करुन दिनांक २१/१०/१९८८ पासून वाहनचालक पदाचा पगार देण्याबाबत मागणी केली. मा.औद्योगिक न्यायालयाने श्री.जोंधळे यांना दिनांक २१/१०/८५ पासून पुर्वलक्षी प्रभावाने वाहनचालक पदावर रुपांतरित अस्थाई आस्थापनेवर घेण्याबाबत व प्रतिवादींनी अर्जदारास ‘वाहनचालक’ पदाचे वेतन/वेतन फरक अदा करण्याचा निर्णय दि.२८.०९.१९९५ रोजी दिला. त्यानंतर विधी व न्याय विभाग,औरंगाबाद यांच्या सल्ल्याने मा.औद्योगिक न्यायालयाच्या आदेशाविरुध्द मा.उच्च न्यायालय खंडपीठ,औरंगाबाद येथे दाखल केलेल्या रिट पिटीशन क्र.४६७१/१९९६ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिनांक १५/०२/२०१० रोजी निकाल देवून त्यामध्ये प्रतिवादी यांनी सन १९८३ ते १९८६ या कालावधीत वाहनचालक म्हणून काही दिवस काम केले असून त्यांना ‘वाहनचालक’ पदावर रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्यात आले आहे.त्यांनी दि.२१.१०.१९८५ पासून सतत ५ वर्षापेक्षा अधिक वर्ष या पदावर काम केलेले आहे. यास्तव ते दि.२१.१०.१९९० पासून रुपांतरित अस्थाई आस्थापनेवर घेण्यास पात्र आहेत असे नमूद करुन श्री.जोंघळे,यांना दि.२१.१०.१९९० पासून ‘वाहनचालक’पदावर रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा निर्णय दिला. तसेच यामुळे त्यांना जर काही रकमेचे अतिप्रदान झाले असेल ती रक्कम त्यांना देय होणा-या

रकमेमधून समायोजित करण्यात यावी, असेही निकालात नमूद केले. हयाबाबत उच्च न्यायालयाच्या सरकारी वकीलानी श्री.विश्वनाथ जोंधळे,यांच्याबाबतीत मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाचे पालन करणे उचित राहिल,असे अभिप्राय दिले. तसेच विधी व न्याय विभाग,औरंगाबाद यांनी सदर प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयात एस.एल.पी दाखल करण्यास वाव नसल्यामुळे मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार कार्यवाही करावी,असे अभिप्राय दिले. सदर अभिप्राय व मा.उच्च न्यायालयाचा निर्णय विचारात घेऊन श्री.जोंधळे यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णयः-**

अधिक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,अहमदनगर अंतर्गत श्री.विश्वनाथ बापू जोंधळे,यांच्याबाबतीत क्र- इएसडब्ल्यू-१४८७/(१३७/८७)आ(का), दिनांक- २७/०९/१९८८,हा शासन निर्णय त्यांच्यापुरता आणि पाटबंधारे विभाग,शुध्दीपत्र क्र-इएसडब्ल्यू-१४८७/(१३७/८७)आ(का), दिनांक- २०/०३/१९८९ अधिक्रमित करण्यात येत आहे.आता श्री.जोंधळे,यांना त्यांच्या नावांसमोर दर्शविल्याप्रमाणे त्यांनी धारण केलेले तत्सम पद खालीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ क्र | कर्मचा-याचे नांव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.विश्वनाथ बापू जोंधळे | रोजंदारी | मजूर | २१/१०/१९९० | वाहनचालक | रु. ९५० - १५०० (जुनी)<br>रु. ३०५० - ४५९० (५ वा वेतन आयोग ) |

३. श्री.जोंधळे ,यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदाकरीता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान / कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यात येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशीव्यतिरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यात येत आहे.

४. अधिक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,अहमदनगर यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत, याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत निर्गमित करून ते संबंधित कर्मचा-याच्या निदर्शनास आणावेत. तपशीलामध्ये संबंधित कर्मचा-यांचे नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे, तो दिनांक,इत्यादी बाबी नमूद कराव्यात.त्यामध्ये कोणतीही चूक अथवा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिका-याने अशी बाब तात्काळ शासनाच्या निदर्शनास आणावी. क्षेत्रिय अधिका-याने सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करू नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-यांच्या
व्यक्तिशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशाच्या बाबतीत संबंधित कर्मचा-याची (नांव,

पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याचा दिनांकात दुरूस्ती इत्यादी बाबी) कोणतीही तक्रार नसल्यास त्यांच्याकडून तशा आशयाचे प्रपत्र "ब"मधील दिलेल्या नमुन्यात हमीपत्र (Undertaking )घेऊन ते त्या कर्मचा-याच्या सेवापटात / सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनाला सादर केला जाईल, याबाबत संबंधित अधीक्षक अभियंत्यानी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत / त्रुटी असल्याची संबंधित कर्मचा-याची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरूपात घेण्यात यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरूस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनास सादर केला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरूस्ती प्रस्ताव पाठविताना संबंधित कर्मचा-याच्या नेमणूकांच्या आदेशांच्या प्रती, नाममात्र हजेरीपटाच्या प्रती आणि सेवापट पाठविण्याची दक्षता घ्यावी.

५. श्री.जोंधळे,यांची वेतननिश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी आणि त्यांच्या थकबाकीची परिगणना त्यानुसार करावी. श्री.जोंधळे यांना दि.२१.१०.१९९० पुर्वी वाहनचालक पदाचे वेतनश्रेणीनुसार अधिक रक्कम अदा केली असल्यास सदर रक्कम दि.२१.१०.१९९० पासून अदा होणा-या वाहनचालक पदाच्या वेतनफरकाच्या रकमेमधून समायोजित करावी. श्री.जोंधळे यांना अनुज्ञेय होणा-या थकबाकीपैकी दि.- ३१ ऑगस्ट २००० पुर्वीची रक्कम दहा वार्षिक समान हफ्त्यात भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करावी. जमा केलेल्या रकमेस ३ वर्षे पुर्ण झाल्यानंतर ती रक्कम आहरणासाठी पात्र राहील. दि.३१ ऑगस्ट २००० नंतरची थकबाकीची रक्कम रोखीने व धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी. परंतू सदर रकमेवर भविष्य निर्वाह निधीशी सबधित व्याज वगळता अन्य कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही आणि संबंधित कर्मचा-याकडून भविष्यात व्याजाबाबतची मागणी करण्यात येणार नाही, अश्याप्रकारचे प्रतिज्ञापत्र लिहून घेणे बंधनकारक राहील.

६. या आदेशान्वये रूपांतरीत करण्यात आलेल्या कर्मचा-यांच्या वेतनापोटी होणारा खर्च सन २०११ ते २०१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशीर्षाखालील मंजूर अनूदानातून भागविण्यात यावा.

७. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.रूअआ- १५९६/२२८/सेवा -५, दिनांक २४.०४.२००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून काढण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय www.maharastra.gov.in हया संकेत स्थळावर २०१११२१२०५५८४६००१ हया सांकेतांक क्रमांकावर प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

अ.अ.कोदे

**( अ.अ.कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

प्रत सहपत्रासहित अग्रेषित :-
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.
वित्त विभाग, (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
अधिक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर
निवडनस्ती /आस्थापना (कामगार ) संग्रहार्थ